१२ व्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या नवीन मागासवर्गीय सहकारी सूत गिरणीस मान्यता देणेबाबत.
डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., नागपूर.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांक : सूतगि १२००/प्र.क्र.४३७/टेक्स१(अ)

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ जुलै, २०१४.

**वाचा :-**

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-सूतगि ३२९३/प्र.क्र.१८६/टेक्स १, दिनांक : ११ ऑगस्ट, १९९३.
२) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/टेक्स १, दिनांक : २४ मार्च, १९९९.
३) शासन निर्णय समाजकल्याण विभाग क्रमांक-एमपीसी-१०९९/प्र.क्र.२४४/विघयो २, दिनांक : ३० मार्च, २०००.
४) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.-सूतगि ११२०००/प्र.क्र.१२५/टेक्स १ (अ), दिनांक : २ ऑगस्ट, २००३.
५) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-सूतगि ११०८/प्र.क्र.९१/टेक्स १ (अ), दिनांक : ३० जून, २०११.
६) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक-धोरण २०११/प्र.क्र.३३५/टेक्स २, दिनांक : २ जानेवारी, २०१२.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णय दि.२ जानेवारी, २०१२ अन्वये राज्याच्या नवीन वस्त्रोद्योग धोरणामध्ये विदर्भ / मराठवाडा व उत्तर महाराष्ट्रातील सहकारी सूत गिरण्यांना सध्याच्या ५:४५:५० आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्याची योजना यापुढेही चालू राहील, तसेच ज्या तालुक्यात सहकारी तत्वावरील सूत गिरण्यांना यापूर्वी शासनाकडून भागभांडवल स्वरुपात मदत करण्यात आलेली आहे अशा तालुक्यात सहकारी तत्वावरील नवीन सूत गिरणी उभारण्यास ५:४५:५० आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देण्यात येणार नाही, असे नमूद आहे. त्यानुसार मागासवर्गीयांचा सहकारी सूत गिरण्यां म्हणून नोंदणी झालेल्या तथापि अर्थसहाय्यासाठी निवड न झालेल्या सूत गिरण्यांपैकी १२ व्या पंचवार्षिक योजनाकाळात शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

वस्त्रोद्योग धोरणानुसार ज्या तालुक्यात सहकारी तत्वावरील सूत गिरण्यांना यापुर्वी शासनाकडून भागभांडवल स्वरुपात मदत करण्यात आली आहे, अशा तालुक्यात सहकारी तत्वावरील नवीन सूत गिरणी उभारण्यास ५:४५:५० आकृतीबंधाप्रमाणे अर्थसहाय्य देता येणार नाही

असे नमूद आहे. परंतु डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., नागपूर ही नागपूर ग्रामीण तालुक्यात असून या तालुक्यात यापूर्वी बॅरि.शेषराव वानखेडे या सूत गिरणीस शासनाकडून भागभांडवल स्वरुपात मदत करण्यात आली आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., नागपूर ही सूत गिरणी नागपूर जिल्हयातील बुटीबोरी या औद्योगिक क्षेत्रात असून महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने सदर क्षेत्र "Textile Zone" म्हणून घोषित केले आहे. ही बाब पाहता नागपूर ग्रामीण तालुक्यात आणखी एक सूत गिरणी अर्थसहाय्यासाठी घेण्यास एक विशेष बाब म्हणून विदर्भातील डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., नागपूर या मागासवर्गीय सहकारी सूत गिरणीची १२ व्या पंचवार्षिक योजना काळात ५:४५:५० आकृतीबंधाप्रमाणे शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या दिनांक ११ ऑगस्ट, १९९३ व दिनांक २४ मार्च, १९९९ च्या तसेच दिनांक २ ऑगस्ट, २००३ व दिनांक ३० जून, २०११ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती तसेच समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभागाच्या दिनांक ३० मार्च, २००० च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती व वेळोवेळी शासनाकडून भविष्यात देण्यात येणाऱ्या अटी व शर्ती या सूत गिरणीवर बंधनकारक राहतील.

३. हा शासन निर्णय सामाजिक न्याय विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाशी झालेल्या विचार विनिमयानंतर व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३२०/१४/व्यय-२, दिनांक २०/७/२०१४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१२४४०३२६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anilkumar Ramdaspant Ugle

Digitally signed by Anilkumar Ramdaspant Ugle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anilkumar Ramdaspant Ugle
Date: 2014.08.22 12:40:09 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, नागपूर.
३. विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था, नागपूर

४. जिल्हाधिकारी, नागपूर.
५. व्यवस्थापकीय संचालक, ऑल इंडिया फेडरेशन ऑफ को-ऑप. स्पिनिंग मिल्स लि., कॅनडा बिल्डींग, २ रा मजला, डॉ. डि एन. रोड, मुंबई - ४०० ००१.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या., मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई / नागपूर.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४३१), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
१०. सामाजिक विभाग (विघयो-२), मंत्रालय, मुंबई.
११. अध्यक्ष/प्रशासक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मागासवर्गीय सहकारी सूत गिरणी मर्या., नागपूर
१२. निवड नस्ती (टेक्स १ (अ)/(ब) ).